





जनहिताय सर्वदा

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**मादाम काम मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक**
**मंत्रालय, मुंबई-४०००३२.**

दुरध्वनी क्र. ०२२-२२०४८२४७ Email ID : dokh.rfd@maharashtra.gov.in

---

**क्रमांक:-गौखनि-३५/०७१७/प्र.क्र.३१२/ख-१ दिनांक :- ०७ ऑगस्ट, २०२३**

**विषय : गौण खनिज-सातारा**
मौजे म्हसवड ता.माण, जि.सातारा येथील वाळू भुखंड क्र.३ (गट नं.५००, ५०१ ते ५३४) या वाळू भूखंडासाठी शासन जमा केलेली स्वामित्वधनाची रक्कम परत मिळणेबाबत.
व्ही.एम.मातेरे इन्फ्रास्ट्रक्चर (इंडिया) प्रा.लि. तर्फे संतोष प्रल्हाद थोरात

**शासन ज्ञापन:**

कराड-तासगाव-जत-विजापूर रोड एन. एच. १६६, -रा.मा.५५/८३० ते ८१/८१९ तासगाव ते शिरढोण या रस्त्याच्या कामाकरीता राज्य पर्यावरण समितीची मान्यता मिळालेले माण तालुक्यातील माणगंगा नदी पात्रालगतचे एकूण ६ वाळू भूखंड जिल्हाधिकारी कार्यालय सातारा यांनी राखून ठेवले होते. त्यानुसार कार्यकारी अभियंता, राष्ट्रीय महामार्ग विभाग, कोल्हापूर यांच्या वतीने व्ही.एम.मातेरे,इन्फ्रास्ट्रक्चर (इंडिया) प्रा.लि. यांचे अधिकृत प्रतिनिधी यांनी मौजे म्हसवड वाळू भूखंड क्रं. ३ ( गट नं.५००, ५०१ आणि ५३४ ) ता.माण जि.सातारा या वाळू भूखंडातून १५५४ ब्रास वाळूगटासाठी प्रति ब्रास रुपये ५८६९/- प्रमाणे रु.९१,२०,४२६/- रक्कम शासन जमा केलेली आहे.

**०२.** तथापि, उक्त रस्त्याचे ७० टक्के काम कृत्रीम वाळू वापरुन करण्यात आलेले असून उर्वरीत ३० टक्के बांधकामासाठी कृत्रीम वाळू तयार करुन ठेवलेली असलेने नैसर्गिक वाळूची आवश्यकता नाही, असे उप कार्यकारी अभियंता, राष्ट्रीय महामार्ग विभाग, कोल्हापूर यांनी जिल्हाधिकारी, सातारा यांना कळविले. त्यामुळे मौजे म्हसवड वाळू भूखंड क्रं. ३ ( गट नं.५००, ५०१ आणि ५३४ ) ता.माण जि.सातारा या वाळू गटाचा ताबा अर्जदार यांना देता आला नाही. सदर वाळूगटाची रक्कम परत मिळण्याबाबतची अर्जदाराची विनंती शासन पत्र दिनांक ०७/१२/२०२० अन्वये अमान्य केली होती.

**०३.** शासन पत्र दिनांक ०७/१२/२०२० व्यथित होऊन लिलावधारक यांनी मा. मंत्री (महसूल) यांचेकडे दाखल केलेल्या अपीलावर मा. मंत्री महोदयांनी दिनांक १७/०३/२०२३ रोजीच्या अर्धन्यायिक आदेशान्वये शासन पत्र दि.०७/१२/२०२० रद्द करुन अर्जदार यांना रक्कम परत करण्याचे आदेश दिले असल्याने मौजे म्हसवड ता.माण, जि.सातारा येथील वाळू भुखंड क्र.३ (गट नं.५००, ५०१ ते ५३४) या वाळू गटाचा ताबा अर्जदार यांना न दिल्याने वाळूगटाच्या स्वामित्वधनाची शासन जमा केलेली रुपये ९१,२०,४२६/- इतकी रक्कम परत करण्याचा शासनाने निर्णय घेताला आहे.

**०४.** सबब, अर्जदार व्ही.एम.मातेरे इन्फ्रास्ट्रक्चर (इंडिया) प्रा.लि. तर्फे संतोष प्रल्हाद थोरात यांनी उक्त वाळू भूखंडाच्या स्वामित्वधनाची संपूर्ण रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची व यापुर्वी ही रक्कम अदा केलेली नाही, याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर त्यांना रक्कम रु.९१,२०,४२६/- (रुपये एक्याण्णव लाख वीस हजार चारशे सवीस फक्त) इतकी अदा करण्यास या शासन ज्ञापनाद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

**०५.** या बाबीवर होणारा खर्च सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता "०८५३-अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग"१०२-खनिजाबाबत सवलत फी व स्वामित्वधन,९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग-वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६) या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या अंदाजपत्रकीय तरतुदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

**०६.** सदर शासन ज्ञापन, वित्त विभागाच्या क्र.विअप्र-२०१९/प्र.क्र.२०/२०१९/विनियम, दि.०८/०८/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८, भाग-२ नुसार महसूल व वन विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२३०८०८१८०७५१३६१९ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

SHIVAJI SONAJI CHOURE

Digitally signed by SHIVAJI SONAJI CHOURE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fa37c7e079f23b78a27c84b9d6e46f94d549fc79ba170d5815f3619617b13313, pseudonym=0592554E096862442D21372FBE05C91C3D50FA17, serialNumber=03FE2B2D715BED4B0D90A99525AE06946672E68EA905C97DA50B34FD21223011, cn=SHIVAJI SONAJI CHOURE
Date: 2023.08.08 18:09:15 +05'30'

**( शिवाजी चौरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**
**जिल्हाधिकारी, सातारा**

**प्रत:-**

१) विभागीय आयुक्त, पुणे.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, प्रतिष्ठा भवन,१०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई-४०००२०.
३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)- १, प्रतिष्ठा भवन,१०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई-४०००२०.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा
५) वित्त विभाग (व्यय-९/अर्थसंकल्प-३/६/१४ कार्यासने) मंत्रालय, मुंबई-४०००३२
६) कार्यासन अधिकारी (कार्यासन ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२
७) निवडनस्ती